अर्थसंकल्पात केलेल्या तरतुदींमध्ये विविध शिर्षाखाली होणारी बचत वेळेवर प्रत्यार्पित करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक - लोलेस १०८७/प्र.क्र. २५/कोषागारे-६,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक ९ फेब्रुवारी, १९८७.

## शासन परिपत्रक

महालेखापालांकडून प्रतिवर्षी हिशोब तपासणी पूर्ण करण्यात आल्यानंतर महसूल , विनिमय लेखे इत्यादीबाबतचे अहवाल तयार करण्यात येऊन मंत्रिमंडळाच्या मान्यतेनंतर ते विधानसभेला सादर केले जातात. तदनंतर या अहवालांवर लोकलेखा समितीतर्फे विचार करण्यात येतो. या संदर्भात राज्याच्या प्रशासकीय विभागांना अर्थसंकल्पातील निरनिराळ्या शिर्षाखाली ज्या तरतुदी उपलब्ध करण्यात येतात, त्यामध्ये जी रक्कम खर्च करण्यात येत नाही अशी ,बचत, वेळेवरती प्रत्यार्पित करण्यात येत नाही असा आक्षेप लोकलेखा समितीने घेतला आहे. या संदर्भातील कार्यवाही मुंबई अर्थसंकल्प नियमावलीतील [एफ.पी.६] परि. १७३ मध्ये विहित केलेली असतानाहि, ती काटेकोरपणे पाळण्यात येत नाही असे समितीच्या निदर्शनास वारंवार आलेले आहे. विशेषत: बचतीची कारणे सांगताना, मंजूर केलेली पदे भरण्यात आलेली नाहीत किंवा काटकसरीच्या आदेशांमुळे खर्च करण्यात आलेला नाही अशी कारणे सांगितली जातात. पदे भरण्यामधील अडचण ही आर्थिक वर्ष संपण्याअगोदर किमान १ महिना तरी स्पष्ट झालेली असते. त्याचप्रमाणे शासनाचे काटकसरीचे आदेश हेही आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी किमान ३ ते ४ महिने निर्गमित केलेले असतात. असे असतांनाही निरनिराळ्या लेखाशिर्षाखाली उपलब्ध झालेली बचत ही त्या संदर्भातील नियमां-प्रमाणे वेळेवर प्रत्यार्पित करण्यामध्ये निश्चित कोणत्या अडचणी आहेत हे स्पष्ट होत नाही. लोकलेखा समिती या अनियमिततेकडे फार गांभीर्याने पहात असल्यामुळे सर्व नियंत्रक अधिका-यांच्या निदर्शनास ही वस्तुस्थिती आणण्यात येत आहे व यावर्षी व त्यानंतरच्या वर्षात जी रक्कम खर्च होणार नाही ती वेळेवर प्रत्यार्पित केली जाईल याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

व. अ. पंडित,
उप सचिव.

एच-८६१[१०,०००-१०-२-८७]

[कृ.मा.प.]

प्रति,

१. मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागाचे सचिव,
२. मंत्रालयाच्या विविध प्रशासकीय विभागाखालील सर्व नियंत्रक अधिकारी यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी,
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५. महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर,
७. वित्त विभागातील सर्व अर्थसंकल्प, व्यय, कोषागार, साधनसंपत्ती, अर्थोपाय कार्यासने,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

---